राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/पुणे/नागपूर/ अमरावती/औरंगाबाद महसूली विभाग या नव्याने सुरु झालेल्या कार्यालयातील वित्तीय बाबींकरिता तात्पुरत्या स्वरुपात “आहरण व संवितरण अधिकारी” आणि “नियंत्रक अधिकारी” घोषित करणे.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. आरटीएस-२०२१/प्र.क्र.२९५/लो.दि.कक्ष**
मंत्रालय, विस्तार इमारत, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ जानेवारी, २०२२.

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.आरटीएस-२०२१/प्र.क्र.१५८/लो.दि.कक्ष, दि.२३ नोव्हेंबर, २०२१.
२) राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयाचे अ.शा.पत्र क्र.विआका-२०२१/प्र.क्र.७१/मुसेहआ, दि.३० नोव्हेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ च्या कलम १३ मधील तरतूदीनुसार दि.३० जुलै, २०१६ रोजीच्या अधिसूचनेन्वये “महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग” घटित करण्यात आलेला आहे. सदर आयोगामध्ये एक मुख्य सेवा हक्क आयुक्त व सहा महसूली विभागांसाठी (कोकण/ नाशिक/पुणे/ नागपूर/ अमरावती/औरंगाबाद) करिता प्रत्येकी एक राज्य सेवा हक्क आयुक्त यांचा समावेश आहे. त्यानुसार राज्य सेवा हक्क आयुक्त,नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या पदावर शासन अधिसूचना दि.२३/११/२०२१ अन्वये नेमणुका करण्यात आल्या असून संबंधित आयुक्तांनी दि.०१/१२/२०२१ रोजी पासून त्यांचा पदभार स्विकारला आहे. सदर कार्यालये नियमितरित्या कार्यान्वित होईपर्यंत, सदर कार्यालयांना स्वतंत्र आहरण व संवितरण कोड प्राप्त होईपर्यंतच्या कालावधीतील त्या कार्यालयातील प्रतिनियुक्तीने नियुक्त अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन, संबंधित विभागातील राज्य सेवा हक्क आयुक्तांचे वाहन व इतर भत्ते, संगणक/झेरॉक्स/प्रिंटर संदर्भातील सुरुवातीचा खर्च इ. उद्भवणाऱ्या वित्तीय/आर्थिक बाबींच्या अडचणींच्या अनुषंगाने तसेच या पाच कार्यालयांसाठी स्वतंत्र आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त होईपर्यंत सबंधित विभागीय आयुक्त (महसूल) कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी यांना राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या कार्यालयांसाठीचे आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबतची विनंती संदर्भाधिन दि.३० नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या ५ कार्यालयांसाठी वित्तीय/आर्थिक बाबींकरिता संबंधित विभागीय आयुक्त (महसूल) यांच्या कार्यालयाचे **“आहरण व संवितरण अधिकारी” आणि “नियंत्रक अधिकारी”** यांना तात्पुरत्या स्वरुपात **पुढील आदेश होईपर्यंत** संबंधित राज्य सेवा हक्क आयोग, महसूली विभाग या कार्यालयांचे **“आहरण व संवितरण अधिकारी” आणि “नियंत्रक अधिकारी”** म्हणून घोषित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच नियंत्रक अधिकारी, राज्य सेवा हक्क आयोग (मुख्यालय) यांनी राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या कार्यालयातील प्रतिनियुक्तीने नियुक्त अधिकारी/कर्मचारी

यांचे वेतन, संबंधित विभागातील राज्य सेवा हक्क आयुक्तांचे वाहन, इतर भत्ते, संगणक/झेरॉक्स/प्रिंटर संदर्भातील सुरुवातीचा खर्च इ. वित्तीय/आर्थिक बाबींच्या खर्चासाठी लागणारा निधी राज्य सेवा हक्क आयोगाशी संबंधित "मागणी क्र.ए-४, २०७० - इतर प्रशासनिक सेवा, (८००) इतर खर्च, (००), (११) राज्य सेवा हक्क आयोग, (१३) कार्यालयीन खर्च - संगणक संकेतांक २०७०A००२" या अर्थसंकल्पीय लेखाशिर्षांतर्गत मंजूर असलेल्या निधीतून संबंधित विभागीय आयुक्त (महसूल) कार्यालयांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीमधून उपलब्ध करुन द्यावा. तसेच संबंधित आहरण व संवितरण अधिकारी, विभागीय आयुक्त (महसूल) यांच्याकडून खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र, खर्चाचा तपशिल तसेच देयकांच्या मुळ प्रती उपलब्ध करुन घ्याव्यात. **तसेच नियंत्रक अधिकारी, राज्य सेवा हक्क आयोग (मुख्यालय) यांनी वरीलप्रमाणे कार्यवाही करताना शासन नियमावलीचे काटेकोर पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी**.

तसेच हे अधिकार वित्तीय बाबीपुरतेच मर्यादीत राहतील.

**३.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४१/२०२१/कोषा प्रशा-५, दि.०६/०१/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०२१६१६०३४७३६०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JANA JIVA VALVI

Digitally signed by JANA JIVA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=816d3fe4c7042f66b4ac73a1f0087cd8fda3e115d42dc8b54c0e783064c80dc1, pseudonym=BC7303629AB7AFCA8CE15C55D2BEFE77F3006E6E, serialNumber=FD6F9785FE220B2C0F30D422D401E2DFC838A0D9EC621401534F5B36EAF57F26, cn=JANA JIVA VALVI
Date: 2022.02.16 16:05:32 +05'30'

**( ज. जि. वळवी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/नागपूर/पुणे/अमरावती/औरंगाबाद ( राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयामार्फत)
३. सर्व विभागीय आयुक्त (महसूल), महाराष्ट्र राज्य.
४. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
७. उप सचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
८. उप सचिव / अवर सचिव, कार्यासन-२६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/नागपूर/पुणे/अमरावती/औरंगाबाद
११. कक्ष अधिकारी, कार्यासन व्यय-४/कोषा प्रशा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (लो.दि.कक्ष).